सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी कोल्हापूर यांना द्यावयाच्या अनुदानाचे वाटप मुख्य लेखाशिर्ष-२५१५००२६.सातवा हप्ता (वेतन)

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः अनुग्रा २०२३/प्र.क्र.३५/आस्था-१५
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट,
मुंबई- ४०० ००१.
दिनांक : १५ मार्च, २०२४.

वाचा -

१) शा. नि., ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र.८४५/०९, दि.१७.०९.१९९३.
२) शा. नि., ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.- प्रशिक्षण ११९९/ प्र.क्र.५८१/६१, दि. २३.९.१९९८
३) शा. नि. ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.-प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दि.१२.६.२००१.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३, दि.०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४.
५) शा. नि. ग्रा.वि.वि., क्र.अनुग्रा२०२३/ प्र.क्र.३५/आस्था-१५, दि.१९.०४.२०२३, दि.२१.०७.२०२३, दि.२१.०९.२०२३, दि.०९.११.२०२३, दि.२८.१२.२०२३ व दि.१२.०२.२०२४.

प्रस्तावना :

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता "मागणी क्र. एल - ३, लेखाशीर्ष २५१५, इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, ००३-प्रशिक्षण, (०१) प्रशिक्षण कार्यक्रमासाठी सहाय्यक अनुदान (०१) (०२) श्री मौनी विद्यापीठाच्या विद्यमाने गारगोटी येथे संयुक्त प्रशिक्षण केंद्राची स्थापना करण्याची योजना (अनिवार्य) (२५१५००२६)" अंतर्गत संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जि.कोल्हापूर यांना ३१ - सहायक अनुदाने (वेतनेतर) साठी रु. ९४१.०० हजार (रुपये नऊ लक्ष, एक्केचाळीस हजार) व ३६ - सहायक अनुदाने (वेतन) साठी रु.१०६३९.०० हजार (रुपये एक कोटी, सहा लक्ष, एकोणचाळीस हजार फक्त) असे एकूण रु.११५८०.०० हजार (रुपये एक कोटी, पंधरा लक्ष, ऐंशी हजार फक्त) इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे.

सन २०२३-२४ च्या सुधारीत अर्थसंकल्पिय तरतूदीनुसार संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जि.कोल्हापूर या प्रशिक्षण संस्थेस ३१ - सहायक अनुदान (वेतनेतर), ३६ - सहायक अनुदान (वेतन) (सांकेतांक क्र. २५१५००२६) अंतर्गत संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जि.कोल्हापूर यांना वेतनेतरसाठी रु. ६५९.०० हजार (रुपये सहा लक्ष एकोणपन्नास हजार फक्त) व वेतनासाठी रु. १०२८६.०० हजार (रुपये एक कोटी दोन लक्ष शहाऐंशी हजार फक्त) असे एकूण रु.१०९४५.०० हजार (रुपये एक कोटी नऊ लक्ष पंचेचाळीस हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पिय अनुदानापैकी आतापर्यंत ६ हप्ते वितरीत करण्यात आले असून आता सुधारीत अर्थसंकल्पिय तरतूदीच्या मर्यादेत सातवा हप्ता वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u> :

वित्त विभाग शासन परिपत्रक दि.१२.०४.२०२३ नुसार सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता वाचा येथील क्र. ५ च्या शासन निर्णयान्वये संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, कोल्हापूर यांना आतापर्यंत पुढीलप्रमाणे निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

(रक्कम : हजारात)

| शासन निर्णय दि.१९.०४.२०२३ पहिला हप्ता (२०%) | | शासन निर्णय दि.२१.०७.२०२३ दुसरा हप्ता | शासन निर्णय दि.२१.०९.२०२३ तिसरा हप्ता | शासन निर्णय दि.०९.११.२०२३ चौथा हप्ता | शासन निर्णय दि.२८.१२.२०२३ पाचवा हप्ता | | शासन निर्णय दि.१२.०२.२०२४ सहावा हप्ता | एकुण वितरीत निधी | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| वेतनेतर | वेतन | (१४%) (वेतन) | (१४%) (वेतन) | (१६%) (वेतन) | वेतनेतर (५०%) | वेतन (१६%) | (१५%) (वेतन) | वेतनेतर | वेतन |
| १८८.२०० | २१२७.८०० | १४८९.४६० | १४८९.४६० | १७०२.२४० | ४७०.५० | १७०२.२४० | १५९५.८५० | ६५८.७०० | १०१०७.०५ |

२. आता, ३६ - सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाकरीता सुधारीत अर्थसंकल्पिय तरतुदीच्या मर्यादेत निधी वित्त विभागाकडून उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सदर मर्यादेच्या अधिन राहून संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी यांना ३६ - सहायक अनुदान (वेतन) या उद्दीष्टाकरिता रु.१७८.९५ (रुपये एक लक्ष अठ्याहत्तर हजार नऊशे पन्नास फक्त) इतके अनुदान सातवा हप्ता म्हणून वितरित करण्यास शासन मान्यता देत आहे.

३. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्रमांक प्रशिक्षण-११९८/प्र.क्र.५८१/६१, दि.२३ सप्टेंबर, १९९८ व शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.८५९/४४, दि. १२ जून २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुंषगाने उपायुक्त (आस्था), पुणे विभाग, पुणे यांनी सदर प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

४. सदर निधी वितरणाकरिता तसेच निधी ज्या बाबींकरीता मंजूर करण्यात आला आहे, त्याच बाबींवर खर्च करण्यात येईल, याची काटेकोर अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांची असेल. तसेच सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्रही तात्काळ सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

५. हा खर्च "मागणी क्र.एल ३, २५१५, इतर ग्रामीण विकास कार्यक्रम ३६ - सहाय्यक अनुदाने (वेतन) (२५१५००२६)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो यावर्षी लेखाशिर्षातर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच सदर खर्च त्याच संकेतांकाखाली खर्च पडतो आहे या बाबत ताळमेळ घालून खातरजमा करावी व विभागीय आयुक्तांनी दरमहा शासनास कळवावे. सदर लेखाशिर्षाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबधित उपायुक्त (आस्थापना) हे काम पाहतील.

६. विभागीय आयुक्त कार्यालयाने प्रशिक्षण केंद्रास अनुदान वितरीत करताना वेतन/वेतनेतर बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. उपरोक्त नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच प्रशिक्षण केंद्राने वेतन/वेतनेतर करिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे

याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतन/ वेतनेतर करिता अनुदान वितरीत करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित केंद्राच्या प्राचार्यांची असेल.

७. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत / सुविधा पुरवतील.

८. हा शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार अनुक्रमांक ४, परि. २७ (२) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून तसेच वित्त विभागाकडील अनौ. संदर्भ क्र.२०२/२०२४/व्यय-१५, दि.०५.०३.२०२४ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०३१५१७३७०४११२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

POPAT D. DESHMUKH

Digitally signed by POPAT D. DESHMUKH
DN: cn=POPAT D. DESHMUKH, o=Rural Development Department, ou, email=P.d.deshmukh@nic.in, c=IN
Date: 2024.03.15 18:04:55 +05'30'

(पो.द. देशमुख)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत-

१. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे (दोन प्रती)
२. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
३. संचालक, संयुक्त प्रशिक्षण केंद्र गारगोटी, जि.कोल्हापूर
४. उपायुक्त (आस्था) विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई. (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर. (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
८. वित्त विभाग (का.क्र.अर्थसंकल्प-१७/व्यय १५)
९. प्राचार्य, संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जि.कोल्हापूर (२ प्रतींसह)
१०. कार्यासन क्र. वित्त-१ व वित्त-७ ग्राम विकास विभाग
११. निवड नस्ती का.क्र. आस्था-१५